सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत वितरीत करण्यात येत असलेल्या अन्नधान्य व्यवहारातील तुटीची प्रतिपूर्ती करण्यासाठी अर्थसहाय्य सन २०१९-२०

महाराष्ट्र शासन
अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
शासन निर्णय क्र.विसउस/कार्या-४(अर्थ)/प्र.क्र.१३७/२०१९-२०/एपीएल
जी.टी.हॉस्पिटल कॉम्प्लेक्स, ८ वा मजला
लो.टि.मार्ग,मुंबई-४००००१
दिनांक-०१ फेब्रुवारी, २०२०.

वाचा-

१. कृषी व अन्न नागरी पुरवठा शासन निर्णय क्र.EST १५६३/१३३०-S-IV दिनांक ११ सप्टेंबर १९६१ व दिनांक २५/११/१९६४.
२. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग परिपत्रक क्र.विसउस/कार्या-४(अर्थ)/२०१५-१६/तुट निधी/प्र.क्र.३८९/२७१७ दि.३०/९/२०१५.
३. अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग शासन निर्णय अधापु-२०१५/प्र.क्र.१००/नापु-२२ दि.२४/७/२०१५, दि.०७/०८/२०१५ व १६/०९/२०१५.
४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३ दि.०८ जुलै, २०१९.

प्रस्तावना-

केंद्र शासनाने दि.५ जुलै २०१३ पासून राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम २०१३ देशात लागू करण्याचा निर्णय घेतला आहे.त्यानुसार राज्य शासनाने माहे फेब्रुवारी २०१४ पासून राज्यात राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम-२०१३ लागू केला असून त्याची अंमलबजावणी करण्यात येत आहे. तथापी राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम-२०१३ अंतर्गत समाविष्ट न होणा-या सार्वजनिक वितरण व्यवस्थेमधील राज्यातील अमरावती व औरंगाबाद विभागातील सर्व जिल्हे व वर्धा जिल्हा असे एकूण १४ जिल्हयामधील एपीएल (केशरी) शेतकरी लाभार्थ्यांना संदर्भ क्र.३ नुसार माहे ऑगस्ट २०१५ पासून लाभ देण्यात येत आहे. केंद्र शासनाकडून अशा लाभार्थ्यांसाठी Economic Cost च्या दराने (गहू रू.२५०५६.७० प्रति मे.टन व तांदुळ रू.३६०१९.१० प्रति मे.टन ) धान्य खरेदी करण्यात येत आहे.सदर अन्नधान्य रास्तभाव दुकानातून गहु रू.२ प्रति किलो व तांदुळ रू.३ प्रति किलो दराने उपलब्ध करून देण्यात येत असून सदर अन्नधान्य व्यवहारातील खरेदी व विक्रीतील फरक, वाहतुक ,हमाली व हाताळणूक यावरील अनुषंगिक खर्च असा एकूण खर्च व धान्य विक्रीतून प्राप्त होणारी रक्कम वजा जाता योजनेमध्ये येणारी तुट भरून काढण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय-

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम २०१३ अंतर्गत समाविष्ट न होणा-या सार्वजनिक वितरण व्यवस्थेमधील राज्यातील १४ जिल्हयामधील एपीएल (केशरी) शेतकरी लाभार्थ्यांना राज्य शासनाकडून संदर्भ क्र.३ नुसार खुल्या दराने धान्य खरेदी करून राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेप्रमाणे धान्य उपलब्ध करून देण्यात येत असल्यामुळे जिल्हाधिकारी यांच्या स्वीय प्रपंजी लेख्यात आलेली तुट भरून काढणे आवश्यक आहे. सन २०१९-२० या वित्तीय वर्षात १४ जिल्हयामधील एपीएल

(केशरी) शेतकरी योजनेतील अन्नधान्य व्यवहारातील खरेदी-विक्री मधील फरक, दुकानदाराचे मार्जिन, PoS मार्जिन, वाहतुक, हमाली व हाताळणुकीवरील अनुषंगिक खर्च यामुळे स्वीय प्रपंजी लेख्यात येणारी तुट रक्कम भरून काढण्यासाठी मंजूर तरतुद रक्कम रू.८९६,६३,२७,०००/- आहे.

२. वित्त विभागाने मुक्त केलेल्या ६०% रक्कमेमधून माहे एप्रिल २०१९ ते डिसेंबर २०१९ कालावधीतील अन्नधान्य खरेदी व विक्री मधील फरक, रास्तभाव दुकानदारांनी प्रत्यक्ष उचल केलेल्या धान्याच्या अनुषंगाने दुकानदारास दयावयाचे प्रति क्विंटल रू.७०/- प्रमाणे मार्जिन (Offline Sale) तसेच PoS मशीनद्वारे वितरीत केलेल्या धान्यासाठी दयावयाचे प्रति क्विंटल रू.१५०/- मार्जिन (Online Sale) आणि या कालावधीत वाहतुक,हमाली व हाताळणूक याबाबीवर झालेला प्रत्यक्ष अनुषंगिक खर्च यासाठी प्रतिपूर्ती करावयाची अर्थसहाय्य **रक्कम रू.५३७,९७,९६,००० /-** (**अक्षरी रूपये पाचशे सदतीस कोटी सत्तान्नव लाख शहान्नव हजार फक्त**) सोबतच्या विवरणपत्रानुसार मुफसल क्षेत्रासाठी (ग्रामिण) जिल्हाधिकारी (जिल्हा पुरवठा अधिकारी) यांना मंजूर करण्यात येत आहे.

३. जिल्हाधिकारी (जिल्हा पुरवठा अधिकारी) यांनी अन्नधान्य व्यवहारातील तुटीच्या रक्कमेची प्रतिपूर्ती करण्यासाठी जिल्हा कोषागार कार्यालय येथून रक्कम आहरीत करून या प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्र.एम-२, मुख्यलेखाशिर्ष २४०८-अन्न साठवण व वखार साठवण (०१)अन्न, १०१-प्रापण व पुरवठा, (०३) प्रापण वितरण व किंमत नियंत्रण, (०३)(०७)अन्नधान्य व्यवहारातील तुटीच्या प्रतिपूर्तीसाठी अर्थसहाय्य (२४०८०४११) ३३-अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली आर्थिक वर्ष २०१९-२० च्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. सदरची रक्कम जिल्हा कोषागार कार्यालयातून आहरीत करून जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी जिल्हाधिकारी यांचे स्वीय प्रपंजी लेख्यात लेखाशिर्ष ४४०८ अन्न साठवण व वखार साठवण यावरील भांडवली खर्च, ०१-अन्न, ९०० भांडवली लेख्यावरील जमा व वसुली, (०३) प्रापण वितरण व किंमत नियंत्रण, (००)(०४) मुफसल भांडवली लेख्यावरील जमा व वसुली (४४०८०१७५),७० वजा वसुली लेख्यात वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१५/प्र.क्र.६/कोषा प्र-५ दिनांक २७ सप्टेंबर,२०१६ नुसार **पुस्तकी समायोजनाद्वारे** जमा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर योजनेवरील अर्थसहाय्य रक्कम विनाअट स्वरूपाची आहे. तरी सदर देयक सादर करतेवेळी वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.मुंधिनि-१००७/प्र.क्र.२२/०७/विनिमय दिनांक १६ मे २००७ नुसार प्रमाणकाच्या दर्शनी भागावर **बिनशर्त (Unconditional)** असल्याबाबत शिक्का मारण्यात यावा.

६. प्रमाणित करण्यात येते कि, या प्रकरणी वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक- अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३ दि. ०८ जुलै, २०१९ मधील अटी व शर्तीची पुर्तता झाली आहे. उपरोक्त शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास मिळालेल्या प्राधिकारानुसार व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ५५, व्यय-१० दि. १९ डिसेंबर ,२०१९ च्या सहमतीने सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२०४१२१७३४४००६ असा आहे.हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

सोबत- १४ जिल्हयातील अपेक्षित तुट रक्कमेचे विवरणपत्र

Abhay Dongar Dhande

Digitally signed by Abhay Dongar Dhande
DN: CN = Abhay Dongar Dhande, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Food Civil Supply Consumer Protection Department
Date: 2020.02.04 12:23:01 +05'30'

**( अभय धांडे )**
**वित्तीय सल्लागार व उपसचिव**

**प्रत-**

१) सर्व जिल्हाधिकारी
२) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
३) सहसचिव (नापु-२२), अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग,मंत्रालय,मुंबई.
४) महालेखापाल-१/२(ले व अ)महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५) सर्व जिल्हा कोषगार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय
६) कार्यासन अधिकारी, (व्यय-१०) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
७) कार्यासन-७(१),७(२) विसउस कार्यालय
८) निवड नस्ती.

अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग शासन निर्णय क्र.विसउस/कार्या-4(अर्थ)/प्र.क्र.137/2019-20/एपीएल सोबतचे जिल्हानिहाय अपेक्षित तुट रक्कमेचे (अर्थसहाय्य) विवरणपत्र

(रक्कम रूपयात)

| अ.क्र. | जिल्हा | एप्रिल 2019 ते डिसेंबर 19 अपेक्षित तुट रक्कमेचे विवरणपत्र |
|---|---|---|
| 1 | औरंगाबाद | 480400000 |
| 2 | जालना | 176900000 |
| 3 | नांदेड | 540300000 |
| 4 | बीड | 633900000 |
| 5 | उस्मानाबाद | 354700000 |
| 6 | परभणी | 292400000 |
| 7 | लातूर | 395600000 |
| 8 | हिंगोली | 143500000 |
| 9 | अमरावती | 768700000 |
| 10 | वाशिम | 193600000 |
| 11 | अकोला | 298500000 |
| 12 | बुलढाणा | 459700000 |
| 13 | यवतमाळ | 451700000 |
| 14 | वर्धा | 189896000 |
| **एकूण** | | **5379796000** |

Abhay Dongar Dhande

Digitally signed by Abhay Dongar Dhande
DN: CN = Abhay Dongar Dhande, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Food Civil Supply Consumer Protection Department
Date: 2020.02.04 12:23:14 +05'30'

(अभय धांडे)
वित्तीय सल्लागार व उपसचिव